बाराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत. लोकनेते गोपिनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या, केज, ता. केज, जि. बीड

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाभाभा-१११६/प्र.क्र.१३/टेक्स-१ (ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीखः ३१ मार्च, २०१७.

वाचा :-

१) **शासन निर्णय सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३**
२) **शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः सूतगि-११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दिनांक २४.३.१९९९**
३) **संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांचे पत्र क्र. कार्या. ६ (१)/सूतगि/२७९१/२०१७, दिनांक १८.३.२०१७.**

प्रस्तावना :-

बाराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या व शासकीय अर्थसहाय्यासाठी निवडलेल्या सहकारी सूतगिरण्यांनी शासनाकडे सादर केलेल्या प्रकल्पांना अर्थसहाय्य करण्यासाठी कर्जे व भागभांडवलाचे प्रमाण १:१ ठेवून सभासद भागभांडवलाच्या १:९ प्रमाणात शासकीय भागभांडवल देण्यासाठी शासनाने मान्यता दिलेली आहे. या सूतगिरण्यांनी शासनास सादर केलेल्या प्रकल्प अहवालाच्या अनुषंगाने प्रकल्प उभारणीच्या कामात केलेली प्रगती लक्षात घेऊन तसेच आतापर्यंत सभासदांकडून जमा केलेले भाग भांडवल लक्षात घेऊन, लोकनेते गोपिनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या, केज, ता. केज, जि. बीड या सूतगिरणीस सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात शासकीय भागभांडवल उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासनाने लोकनेते गोपिनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या, केज, ता. केज, जि. बीड या सूतगिरणीच्या रु.६१७४.२४ लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीस मंजूरी दिलेली आहे. प्रकल्प अहवालानुसार रु.३०८.७१ लाख इतके सभासद भागभांडवल जमा करणे आवश्यक असून त्यांनी रु.३०४.५६ लाख इतके सभासद भागभांडवल जमा केले आहे. त्यानुसार गिरणीला रु.२७४१.०४ लाख इतके शासकीय भागभांडवल गिरणीस अनुज्ञेय ठरते. त्यापैकी आतापर्यंत सदर सूतगिरणीस रु.७००.०० लाख इतके शासकीय भागभांडवल शासन निर्णय क्र.शाभाभा १११६/प्र.क्र.१३/टेक्स-१ (ब), दि.१७.३.२०१६ अन्वये यापूर्वीच वितरीत केलेले आहे.

२. मागासवर्गीय प्रवर्गातील सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भाग भांडवल मंजूर करण्यासाठी सन २०१६-२०१७ या वर्षासाठी रु.५०,००,००,०००/- (रुपये पन्नास कोटी फक्त) इतका नियतव्यय प्राप्त झाला असून त्यापैकी रु.६,६५,००,०००/- इतका निधी यापूर्वी इतर सूतगिरणीस वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित रु.४३,३५,००,०००/- (अक्षरी रुपये त्रेचाळीस कोटी पस्तीस लाख फक्त) उपलब्ध तरतुदीपैकी सदर गिरणीने

बांधकामास सुरुवात केली असल्याने व कंत्राटदारास अग्रीम अदा केला असल्याने, लोकनेते गोपिनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या, केज, ता. केज, जि. बीड (LOKNETE GOPINATHRAOJI MUNDE MAGASVARGIY SAHAKARI SOOTGIRNI LTD., KEJ, TAL. KEJ, DIST. BEED) या सूतगिरणीस रु.२०,४१,०४,०००/- (अक्षरी रुपये वीस कोटी एकेचाळीस लाख चार हजार फक्त) इतकी रक्कम शासकीय भाग भांडवल म्हणून सूतगिरणीच्या बांधकामासाठी तसेच प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबीवर होणारा जास्तीचा खर्च गिरणी स्वनिधीतून करील या अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासकीय भाग भांडवल शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८६/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व सूतगि-११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दि. २४.३.१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती तसेच शासकीय भाग भांडवलासंदर्भात शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर सूतगिरणीस लागू राहतील या मुद्दयाच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

१) प्रस्तुत सूतगिरणींकडून, शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८६/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व क्रमांक सूतगि ११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दिनांक २४.३.१९९९ मधील अटी व शर्तींचे पालन होत आहे याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

२) सदर सूतगिरणींच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतच्या प्रगतीचा तिमाही अहवाल संचालक वस्त्रोद्योग यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

३) प्रस्तुत गिरण्यांसंदर्भात शासन निर्णयामधील तरतुदीनुसार वसुलीबाबत काटेकोरपणे कार्यवाही संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी

४) संचालक वस्त्रोद्योग यांनी पुढील ३ महिन्यांत सदर सूतगिरणीच्या विद्यमान संचालक मंडळाकडून, प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येणाऱ्या रु.२०,४१,०४,०००/- (अक्षरी रुपये वीस कोटी एकेचाळीस लाख चार हजार फक्त) इतक्या रकमेच्या २०% इतक्या वैयक्तिक मत्तेचे तारण मिळवावे. जोपर्यंत असे वैयक्तिक तारण प्राप्त होणार नाही, तोपर्यंत प्रस्तुत वितरीत रक्कम गिरणीस खर्च करता येणार नाही तसेच तोपर्यंत या आदेशाद्वारे मंजूर केलेल्या रकमेवर सूतगिरणीस अधिकर्ष (overdraft) काढून रक्कम खर्च करता येणार नाही असे बंधन संचालक वस्त्रोद्योग यांनी संबंधित बँकेवर घालावे. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी काटेकोरपणे व तातडीने कार्यवाही करावी.

५) प्रस्तुत सूतगिरणींच्या संचालक मंडळाची निवडणूक झाल्यास, नवनियुक्त संचालक मंडळास ३ महिन्यांच्या आत वैयक्तिक मालमत्तेचे तारण द्यावे लागेल. नवनियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतरच पूर्वीच्या संचालक मंडळाचे वैयक्तिक तारण मुक्त करण्यात येईल अशी सुधारणा संस्थेच्या Bye-Laws मध्ये करण्याची कार्यवाही संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी.

६) सूतगिरणींच्या प्रकल्पास मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाच्या Financial Closer चा पुरावा शासनास सादर केल्याशिवाय शासनाचा हिस्सा देता येणार नाही. त्यामुळे त्याबाबतची खात्री संचालक वस्त्रोद्योग यांनी करुन घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

७) प्रस्तुत सूतगिरणीकडे बँकेत जमा असलेल्या निधीचे नियोजन करुन कार्यक्षमतेने विनियोग करीत असल्याची खात्री संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी.

८) प्रस्तुत सूतगिरणींने कर्जाची उचल करुन त्याचा विनियोग प्रकल्प उभारणीसाठी करुन लवकर प्रकल्प पूर्ण करावा. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

९) प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबीवर होणारा जास्तीचा खर्च गिरणी स्वनिधीतून करील या अटीवर शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी तशी कार्यवाही करावी.

१०) सदर सहकारी सूतगिरण्यांच्या खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे अदा करावी. निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रीम अदा करण्यात येऊ नये याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

११) गिरणीस प्राप्त झालेल्या भागभांडवलाचा तसेच गिरणीकडे शिल्लक असलेल्या रकमेचा गिरणी योग्य प्रकारे विनियोग करते किंवा नाही याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

१२) सूतगिरणीने भांडवली वस्तु खरेदी करण्यापूर्वी यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची यथास्थित नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात यावी. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण करावे.

१३) प्रस्तुत गिरणीने खरेदी केलेल्या वस्तू प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा करावे. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण करावे.

१४) खरेदी विषयक प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अद्ययावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

१५) सूतगिरणीची उभारणी माहे डिसेंबर, २०१७ अखेरपर्यंत पूर्ण करावी.

१६) सहकारी सूतगिण्यांवर शासकीय अधिकारी नेमण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन असून याबाबतचा अंतिम निर्णय सर्व सूतगिरण्यांना बंधनकारक राहील.

१७) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दि. २४.३.१९९९ मध्ये शासकीय भाग भांडवल परतफेड करण्याच्या अनुषंगाने विहीत केलेल्या अटींमध्ये सुधारणा प्रस्तावित असून त्याबाबतचा अंतिम निर्णय सदर सूतगिरणीवर बंधनकारक राहतील.

१८) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभागाच्या दि.३० मार्च, २००० च्या शासन निर्णयानुसार मागासवर्गीय सूतगिरण्यांना विशेष घटक योजनेतून दिर्घ मुदती कर्ज देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार सदर सूतगिरणी ही मागासवर्गीय प्रवर्गातील असल्यास त्या सूतगिरणीचा अध्यक्ष व उपाध्यक्ष हा अनुसूचित जातीचा असावा, तसेच या सूतगिरणीमध्ये ७०% पेक्षा जास्त सभासद अनुसूचित जातीचे असावेत. तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.१५ फेब्रुवारी, २०१६ च्या शासन निर्णयानुसार सूतगिरण्यांच्या मागासवर्गीय सभासदांचे जात वैधता प्रमाणपत्र असणे बंधनकारक आहे. सदर अटीची पूर्तता केल्याशिवाय सूतगिरणीस या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम खर्च करता येणार नाही व अधिकर्ष काढता येणार नाही. याबाबत संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी तसे बंधन बँकेवर तसेच सूतगिरणीवर घालावे.

१९) सदर सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहील याबाबत सूतगिरणीने तसेच संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

२०) वितरीत निधीचा योग्य वापर होण्याच्या अनुषंगाने सदर सूतगिरणीच्या प्रगतीचा तिमाही अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

२१) माहे डिसेंबर, २०१७ अखेर सूतगिरणी उत्पादनाखाली येईल यादृष्टीने सूतगिरणीने नियोजन करावे. तसेच याबाबत संचालक वस्त्रोद्योग, नागपूर यांनी नियंत्रण ठेवावे.

२२) सदर सूतगिरणीने प्रकल्प अहवालानुसार रु.३०८.७१ लाख इतके सभासद भागभांडवल जमा करणे आवश्यक आहे. सूतगिरणीने रु.३०४.५६ लाख इतके सभासद भागभांडवल जमा केले आहे. उर्वरित सभासद भागभांडवल रु. ४.१५ लाख सूतगिरणीने तातडीने जमा करावे.

२३) शासकीय भाग भांडवलाची परतफेड विहित वेळेत गिरणीमार्फत होईल यासाठी आवश्यक असलेली सर्व दक्षता संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी घ्यावी.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेल्या शासकीय भागभांडवलाची रक्कम रु.२०,४१,०४,०००/- (अक्षरी रुपये वीस कोटी एकेचाळीस लाख चार हजार फक्त) इतकी रक्कम लोकनेते गोपिनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या, केज, ता. केज, जि. बीड या सहकारी सूतगिरणीच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, शाखा केज या बँकेच्या चालू खाते क्र.३४८१८२९२९८० मध्ये RTGS द्वारे जमा करावी. गिरणीने प्रकल्प पूर्ण करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चासंदर्भात, शासन निर्णय, क्रमांक सूतगि-१२००/११७१३/प्र.क्र.४२६/टेक्स-१ (अ), दि.१५.६.२००६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची मान्यता घ्यावी.

५. या सूतगिरणींस मिळालेले अर्थसहाय्य हे गिरणीचा प्रकल्प पूर्ण करण्यासाठीच उपयोगात आणणे संस्थेवर बंधनकारक राहील. या अर्थसहाय्याचा दुरुपयोग केल्यास, संस्थेच्या संचालक मंडळावर कायदेशीर कारवाई करण्यात येईल व संस्थेला दिलेले अर्थसहाय्य एकरकमी वसूल करण्यात येईल. तसेच अशा प्रकरणी संबंधित संचालक मंडळास व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल. त्यामुळे गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

६. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ अन्वये, "३२-अंशदाने" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी ११, १२, १३, १६, १७ व १८ मधील तरतूदी या प्रकरणी लागू नाहीत. परिच्छेद ७अ, ७ब, ७क, ८, ९, १०, १४ व १५ मधील तरतूदी या प्रकरणी लागू असून सदर तरतुदींची या प्रकरणी खालीलप्रमाणे पूर्तता होत आहे.

७अ) एखाद्या योजनेस / प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणे :- या सूतगिरणीचा बाराव्या पंचवार्षिक योजनेत शासन अर्थसहाय्यासाठी समावेश करण्यात आला आहे.

७ब) नियतव्यय उपलब्धता :- सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद १०.२) मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली नियतव्यय अर्थसंकल्पित आहे.

७क) व ८) विभागास प्रदान वित्तीय अधिकार :- वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं- २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ अन्वये "३२ अंशदाने" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास वित्तीय अधिकार प्राप्त आहेत.

९) पूर्वी खर्च केलेल्या अनुदानाबाबत उपयोगिता प्रमाणपत्रे :- लोकनेते गोपिनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या, केज, ता. केज, जि. बीड या सुतगिरणींस यापूर्वी प्राप्त झालेल्या शासकीय भाग भांडवलाच्या अनुषंगाने ८.३.२०१७ अखेर प्रकल्पाच्या उभारणीवर रु.५९२.७६ लाख खर्च केले असल्याबाबत संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१८.३.२०१७ च्या पत्रान्वये कळविले आहे.

१०) संक्षिप्त देयक प्रलंबितता :- सदर लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक तपशीलवार देयक सादर करण्यासाठी प्रलंबित नाही.

१४) बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय / तांत्रिक मान्यता :- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

१५) कार्यालयीन खरेदीसाठीची कार्यपद्धती :- खरेदी विषयक प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी या अटीचा उल्लेख शासन निर्णयात केला आहे.

तसेच वित्त विभागाच्या दिनांक २०.४.२०१६ च्या शासन निर्णयातील तपासणी सूचीतील अ.क्र.९ मध्ये नमूद केलेल्या अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.

७. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद- ब मधील २) नुसार, वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ च्या परिशिष्टातील अनु. क्र. १, २, ४, ५, ६, ७ व ८ या प्रकरणी लागू नसल्याने व परिशिष्टातील अ.क्र. ३ बाबत नमूद करण्यात येते की, सदर योजना ही नियमित स्वरुपाची राज्य योजनांतर्गत योजना असल्याने तसेच योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने व "३२- अंशदाने" या बाबीखाली शासकीय भाग भांडवलाचे वितरण सदर प्रकरणी करीत असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

८. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण - २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद-ब मधील ३) नुसार, वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ सोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र. ३ मधील तरतुदी विचारात घेता योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

९. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद-ब मधील ३ नुसार, वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ सोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र. ९ संदर्भातील तपासणी सुचीमधील या प्रकरणी लागू असलेल्या मुद्दयांची पूर्तता होत आहे.

१०. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ) नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे :-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार :- वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ अन्वये "३२ अंशदाने" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

२) मंजूर निधी :- "मागणी क्रमांक - व्ही-३ प्रधान लेखाशिर्ष ४४२५ सहकारावरील भांडवली खर्च, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत

योजना (००) (०७) सहकारी सूतकताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (विशेष घटक योजना) (४४२५ ०७०३), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पिय अंदाजान्वये प्राप्त तरतूद रुपये ५०,००,००,०००/- (रुपये पन्नास कोटी फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी आतापर्यंत रु.६,६५,००,०००/- (रुपये सहा कोटी पासष्ट लाख फक्त) इतका निधी खर्च झालेला आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :- सदर सूतगिरणीस यापुर्वी दि.१७/३/२०१६ च्या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या रु.७००.०० लाख इतक्या भागभांडवलापैकी रु.५९२.७६ लाख (८५ %) इतका निधी खर्च झाला आहे.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :- या योजनेखाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे :- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा :- सूतगिरणीच्या स्थापत्य बांधकामाच्या निविदांना मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीची मान्यता घेऊनच सूत गिरणीने बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी करणे बंधनकारक आहे.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत :- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

९) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा:- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी :- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

११. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु.२०,४१,०४,०००/- (अक्षरी रुपये वीस कोटी एकेचाळीस लाख चार हजार फक्त) इतक्या शासकीय भागभांडवलाचा खर्च "मागणी क्रमांक - व्ही-३ प्रधान लेखाशिर्ष ४४२५ सहकारावरील भांडवली खर्च, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (००) (०७) सहकारी सूतकताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (विशेष घटक योजना) (४४२५ ०७०३), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

१२. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु.२०,४१,०४,०००/- (अक्षरी रुपये वीस कोटी एकेचाळीस लाख चार हजार फक्त) इतकी रक्कम लोकनेते गोपिनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या, केज, ता. केज, जि. बीड (LOKNETE GOPINATHRAOJI MUNDE MAGASVARGIY SAHAKARI SOOTGIRNI LTD., KEJ, TAL.KEJ, DIST.BEED) या सूतगिरणीच्या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन सूतगिरणीच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, शाखा केज या बॅंकेच्या चालू खाते क्र.३४८१८२९२९८० मध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री. र. गं. बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. ब. बा. चव्हाण, सह सचिव (सूतगिरणी), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी"म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१३. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दि. २०.४.२०१६ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार तसेच सामाजिक न्याय विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११३४८२९७००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod D. Tupe

Digitally signed by Pramod D. Tupe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28590802f030b209e5b1d488527383f61acb2a10c00b8e9718dcbbc845a30f9b, cn=Pramod D. Tupe
Date: 2017.04.03 13:25:33 +05'30'

**(प्रमोद तुपे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
३. प्र.स. (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (४ प्रतींसह), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. अवर सचिव, १७-स/कार्यासन अधिकारी,१६-स, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. वित्त विभाग, व्यय-२ /व्यय-१५/ अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, कार्यासन अजाक/विघयो, मंत्रालय, मुंबई-३२
९. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११. प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, औरंगाबाद.
१२. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, बीड.
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती).
१६. व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडिया, शाखा केज, ता.केज. जि. बीड.
१७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई.
१८. चेअरमन, लोकनेते गोपिनाथरावजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूतगिरणी मर्या.,केज, ता.केज, जि.बीड.
१९. निवडनस्ती टेक्स १-(अ) / टेक्स १-(ब).